मराठवाडा, विदर्भ व उत्तर महाराष्ट्राच्या जलद विकासासाठी राबवावयाच्या उपाययोजनांचा विशेष कार्यक्रम, २०१८ या कार्यक्रमाअंतर्गत अल्पसंख्याक महिलांसाठी स्वयंसहाय्यता बचत गट योजनाबाबत-निधी वितरणाबाबत.

महाराष्ट्र शासन
अल्पसंख्याक विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक - अविवि-२०१८/प्र.क्र.८४ / का-९
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय मुंबई-४०० ०३२.
दिनांक :१८ मार्च, २०२०

वाचा:- १) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. अविवि-२०१८/प्र.क्र.८४/ का-९ , दि.७ ऑगस्ट २०१९
२) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. अविवि-२०१८/प्र.क्र.८४/ भाग-१/ का-९ ,दि.१९ नोव्हेंबर २०१९
३) व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, मुंबई यांचे पत्र क्र.माविम/ पिएमडी/२०१९-२०/४५६, दि. २५/०२/२०२०.

प्रस्तावना-

मराठवाडा, विदर्भ व उत्तर महाराष्ट्राच्या जलद विकासासाठी राबवावयाच्या उपाय योजनांचा विशेष कार्यक्रम, २०१८ या कार्यक्रमाअंतर्गत अल्पसंख्याक महिलांसाठी स्वयंसहाय्यता बचत गट योजना राबविण्यास मा. मंत्रीमंडळाच्या दि. ०९.०७.२०१९ रोजीच्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेअंतर्गत औरंगाबाद, नागपूर व अमरावती या महसुली भागातील अकोला, अमरावती, बुलडाणा, यवतमाळ, हिंगोली, जालना, उस्मानाबाद, लातूर, चंद्रपूर, बीड, वर्धा, भंडारा, गोदिंया व गडचिरोली या १४ जिल्हयामध्ये प्रत्येक जिल्हा २०० याप्रमाणे २८०० नवीन महिला स्वंयसहायता बचत गटांची स्थापना महिला आर्थिक विकास महामंडळामार्फत करण्यात येणार आहे. स्वंयसहायता बचत गटांची स्थापना करण्याकरिता २ वर्षासाठी रु. १०,०००/- इतका निधी महिला आर्थिक विकास महामंडळाला उपलब्ध करुन देण्याबाबत दि. ७ ऑगस्ट २०१९ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यास अनुसरुन पुरवणी मागणीव्दारे निधीची मागणी केली असता, सन २०१९-२० मध्ये डिसेंबर २०१९ चे हिवाळी अधिवेशनामध्ये रु. ३.१३ कोटी इतका निधी पुरवणी मागणीव्दारे मंजुर करण्यात आला आहे.

२. मराठवाडा, विदर्भ व उत्तर महाराष्ट्राच्या जलद विकासासाठी राबवावयाच्या उपाय योजनांचा विशेष कार्यक्रम, २०१८ या कार्यक्रमाअंतर्गत अल्पसंख्याक महिलांसाठी स्वयंसहाय्यता बचत गट योजनेच्या अंमलबजावणीसाठी सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षात पुरवणी मागणीव्दारे रु.३.१३ कोटी इतका निधी मंजुर करण्यात आला आहे. तथापि, सदर योजनेच्या अंमलबजावणीकरीता सुधारित अंदाजान्वये रु. २.१९ कोटी इतक्या निधीस मान्यता देण्यात आलेली आहे.

३. उक्त योजनेअंतर्गत १४ जिल्हयामध्ये प्रत्येक जिल्हा २०० याप्रमाणे २८०० नवीन स्वंयसहायता बचत गटांची स्थापना करण्याकरीता दोन वर्षासाठी प्रति गट रु.१०,०००/- या प्रमाणे रु.२.८० कोटी इतका निधी महिला आर्थिक विकास महामंडळ, मुंबई यांना वितरीत करणे अपेक्षित आहे.प्रस्तूत प्रकरणी पहिल्या टप्प्यात रु. ७० लाख इतक्या निधीची मागणी संदर्भ क्र. २ अन्वये महिला आर्थिक विकास महामंडळाने शासनाकडे केली आहे. त्यानुसार सुधारित अंदाजान्वये मान्यता देण्यात आलेल्या रु. २.१९ कोटी इतक्या निधीमधून रु. ७० लाख इतका निधी महिला आर्थिक विकास महामंडळाला वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

४. मराठवाडा, विदर्भ व उत्तर महाराष्ट्राच्या जलद विकासासाठी राबवावयाच्या उपाय योजनांचा विशेष कार्यक्रम, २०१८ या कार्यक्रमाअंतर्गत अल्पसंख्याक महिलांसाठी स्वयंसहाय्यता बचत गट योजनाअंतर्गत औरंगाबाद, नागपूर व अमरावती या महसुली भागातील अकोला, अमरावती, बुलडाणा, यवतमाळ, हिंगोली, जालना, उस्मानाबाद, लातूर, चंद्रपूर, बीड, वर्धा, भंडारा, गोदिंया व गडचिरोली या १४ जिल्हयामध्ये प्रत्येक जिल्हा २०० याप्रमाणे २८०० नवीन महिला स्वंयसहायता बचत गटांची स्थापना करण्याकरीता पहिल्या टप्प्यात रु. ७० लाख इतका निधी महिला आर्थिक विकास महामंडळास वितरित करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

५. सदर रकमेचा Electronic Clearing Service (ECS) अवर सचिव (१), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या नावे काढण्यात यावा.या रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र महिला आर्थिक विकास महामंडळाने शासनास सादर करणे आवश्यक राहील. सदर आहरीत करण्यासाठी उप सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग हे नियंत्रक अधिकारी राहतील आणि अवर सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, आहरण व संवितरण अधिकारी राहतील.

६. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. झेडई-०१,२२३१-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, १०३, महिला कल्याण (०१),(०१) (०१) मराठवाडा, विदर्भ, उत्तर महाराष्ट्र याकरिता राबवावयाच्या विशेष कार्यक्रम २०१८ अंतर्गत स्वयंसहाय्यता बचत गटातील अल्पसंख्याक महिलासाठी सहाय्यक अनुदान (कार्यक्रम) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२३५ सी ४०१) या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षाच्या मंजुर तरतूदीतुन भागवावा.

७. प्रस्तुत प्रकरणी ज्या प्रयोजनासाठी निधी वितरीत केला आहे त्याच प्रयोजनासाठी निधी वापरण्यात यावा तसेच त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करणे बंधनकारक राहील.

८. हा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५४/ २०२०/व्यय-१, दि. १२/३/२०२० अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१८११४४१२०६१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh M.
Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, serialNumber=6adb2bdbbd3bd651a8ade806b6e4aea66daa5512ea788889af1515751abc0181, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2020.03.18 11:47:38 +05'30'

**(दि.मा.सोनवणे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) मा. उप मुख्य मंत्री यांचे सचिव,
४) मा. मंत्री/मा.राज्यमंत्री, अल्पसंख्याक विकास विभाग मंत्रालय, यांचे खाजगी सचिव,
५) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, वित्त विभाग आणि अल्पसंख्याक विकास विभाग मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
६) महालेखापाल -१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
७) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१०) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व),
११) व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, बांद्रा(पूर्व),मुंबई,
१२) कक्ष अधिकारी, (व्यय १,अर्थ-१४), वित्त विभाग मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
१३) कक्ष अधिकारी,(का.१४७१) नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
१४) कक्ष अधिकारी, (कार्यासन ७ व २), अल्पसंख्याक विकास विभाग मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१५) निवड नस्ती, कार्यासन -९, अल्पसंख्याक विकास विभाग मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.